अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-अ या संवर्गातून सहसंचालक, गट-अ या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्तीबाबत

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन आदेश क्रमांक :- बदली १११७/प्र.क्र.५७/का. १४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ८ जून, २०१७

## शासन आदेश :-

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-अ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना सहसंचालक, गट-अ संवर्गातील (वेतनसंरचना, वेतन बॅड रु.१५६०० - ३९१००- + ग्रेड पे रु.६६००/-) पदावर खालील परिच्छेद - २ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून या आदेशाच्या दिनांकापासून ७ मे, २०१८ (म.नं.) पर्यंत ११ महिन्यांसाठी अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. दिनांक ७ मे, २०१८ (म.नं.) सदरची पदोन्नती आपोआप संपुष्टात येईल. सदरहु पदोन्नतीनंतरची त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व विद्यमान पदस्थापना | प्रवर्ग | पसंतीचा विभागीय संवर्ग | विभागाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | श्री.कृ.प.वळवी,<br>जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती, नंदुरबार | अ.ज. | नाशिक | नाशिक | सहसंचालक<br>प्रादेशिक कार्यालय,<br>नाशिक |

२. सदर अत्यंत तात्पुरती पदोन्नती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

i) सदर आदेशानुसार संबंधितांनी पदोन्नतीच्या पदाचा पदभार तात्काळ स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे व त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास तसे लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

ii) पदस्थापनेत बदल करण्याकरिता कोणत्याही स्वरुपात राजकीय दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास ही बाब गंभीर ठरवून शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल.

iii) पदोन्नती आदेश प्राप्त झाल्यानंतर जे अधिकारी पदोन्नती स्वीकारणार नाहीत किंवा विविध सबबीखाली पदस्थापना स्वीकारण्यास टाळाटाळ करतील त्यांना आश्वासित प्रगती योजनेंतर्गत देण्यात आलेले लाभ काढून घेण्यात येतील.

iv) पदोन्नतीनंतर संबंधित अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांना पदोन्नतीबाबत स्वारस्य नसल्याचे समजून सामान्य प्रशासन विभागाच्या स्थायी आदेशानुसार निवडसूचीतून त्यांचे नांव वगळण्यात येईल. तद्नंतर कोणत्याही परिस्थितीत त्यांची विनंती मान्य करता येणार नाही.

v) संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्याच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून त्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे व ज्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे त्या पदावर त्यांना संबंधित कार्यालय प्रमुखांनी रुजू करुन घ्यावे. एखाद्या कार्यालयाने रुजू करुन घेण्यास टाळाटाळ केल्यास व सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी नियमित करण्याचा प्रश्न उद्भवल्यास, कोणत्याही परिस्थितीत सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी नियमित करता येणार नाही. यासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि.२.०६.२००३ मधील परिशिष्ट-१, नियम क्र.९ (१४) (एफ) शेरा क्र.२ नुसार सक्तीचा प्रतीक्षा कालावधी निर्माण होण्यास जबाबदार ठरणा-या संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

vi) या अत्यंत तात्पुरत्या पदोन्नतीमुळे उपरोक्त अधिकारी पदोन्नतीच्या पदावरील नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत, असा या पदोन्नतीचा अर्थ होणार नाही व या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे त्यांना नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

vii) सदर तात्पुरती पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

viii) सदर तात्पुरती पदोन्नती यासंदर्भात विविध न्यायालयांत प्रलंबित असलेल्या याचिकांच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०८११२७०३२११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradnya S Mahale

Digitally signed by Pradnya S Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, cn=Pradnya S Mahale
Date: 2017.06.08 12:17:03 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ , मुंबई.
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (नियोजन) /मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
६. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नंदुरबार.
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८. सर्व सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय (सर्व)
१०. उपायुक्त (नियोजन),विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)

११. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१२. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय, मुंबई.
१३. जिल्हा नियोजन अधिकारी , जिल्हा नियोजन समिती (सर्व)
१४. जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय (सर्व)
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नंदुरबार/ नाशिक.
१६. प्रधान सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन अधिकारी, का.१४१७/१४२६, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. श्री. कृ.प.वळवी, जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, नंदुरबार.
१९. निवड नस्ती.